१२ सप्टेंबर १९९२ रोजी एक थोर स्वरसाधक पं. मल्लिकार्जुन मन्सूर यांचे निधन झाले. श्रुती, स्वर, लय, ताल ही चतुर्भुजा गानदेवता त्यांच्यावर प्रसन्न होती. या गानदेवतेला प्रसन्न करून घेण्यासाठी ते स्वतःचं आयुष्य न जगता फक्त गाणे जगले, गाण्यातच राहिले व गाण्यातच संपले. त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचं आणि गायकीचं 'गूढ यात्री'च्या लेखिकेनं घडविलेलं एक सुरेख उत्कट दर्शन...



# स्वर त्यांचे सोबती

• विद्या सप्रे-चौधरी

आ दिस्वराचा साधक, स्वरलयींच्या नंदन-वनातील कल्पतरू, संगीताकाशातला ध्रुवतारा, जिवंत असा एक तानपुरा, भारतीय संगीताची ध्वजा आयुष्यभर श्रद्धेनं फडकवत ठेवणारा गानतपस्वी. एक चालतं बोलतं संगीत व्यासपीठ, सश्रद्ध गानपरंपरेतला तारषड्ज. -

अशा अनेक गौरवोद्‌गारांनी ज्यांचा उल्लेख केला जायचा, ते पं. मल्लिकार्जुन मन्सूर नावाचं माणिक मृत्युमगरीनं गिळंकृत केलं, त्याला वर्ष उलटून गेलं.

राष्ट्रपती, पंतप्रधानांसारखे देशाचे नेते, प्रथितयश कलावंत, जाणकार संगीतप्रेमी आणि सामान्य रसिक सगळेच दुःखी झाले.

ब्याण्णव सालच्या प्रजासत्ताकदिनी पंडितजींना पद्‌मविभूषण पदवी मिळाल्याचं जाहीर झाल्यावर त्यांचा पहिला सार्वजनिक सत्कार करायचं भाग्य मला लाभलं. पंडितजींच्याबरोबर त्यांची मुलगी अक्कमहादेवी या कार्यक्रमाला आली होती. कुणाशी तरी ती बोलत असता पंडितजी माझ्याबरोबर व्यासपीठाकडे निघाले.

'तुमच्या म्हातारपणची सोबत मागेच राहिली ना!' मी त्यांची चेष्टा केली.

'कायमची सोबत वेगळीच असते!' मिस्किलपणे हसत पंडितजी म्हणाले आणि सत्कारसमारंभ सुरू झाला. सत्कार सोहळा संपल्यावर घोटभर गरम दूध घेऊन पंडितजी निघून गेले.

मग पुण्यातला सत्कार. पं. रविशंकरांच्या हस्ते मुंबईतला सत्कार स्वीकारून पंडितजी २१ मे रोजी राजीव गांधींच्या पहिल्या स्मृतिदिनी गाण्यासाठी एकटेच दिल्लीला गेले.

परतल्यावर त्यांची तब्येत बिघडलीच! पुन्हा काही त्यांची माझी निवांत भेट झाली नाही.

पण 'कायमची सोबत वेगळीच!' हे त्यांचे उद्‌गार मात्र त्यांच्या तंबोऱ्याच्या नादाप्रमाणेच कानात झंकारत राहिले.

कायमची सोबत कुणाची, हे त्यांना विचारायचं राहिलंच!

पण खरं म्हणजे या प्रश्नाचं उत्तर त्यांच्याकडून यायला हवंच का?

तानशूर पं. मल्लिकार्जुन मन्सूर, गानगंगा गंगूबाई हानगल, संगीतराज बसवराज राजगुरू, संगीतक्षेत्रात भीमपराक्रम करणारे भीमसेन जोशी आणि अक्षयकीर्ती कुमार गंधर्व हे संगीतमंदिरावरील पंचकलश धारवाडच्याच परिसरातले!

शतकापूर्वीपासून म्हैसूरच्या दसरा महोत्सवात भाग घेण्यासाठी गेलेल्या उत्तरेतल्या कलावंतांना परत येताना धारवाड - हुबळीतल्या रसिकांच्या आग्रहावरून महिना दोन महिने तिथं मुक्काम करावा लागायचा.

सन् एकोणीसशे दहामधील सरत्या मार्गशीर्षात धारवाडपासून पाच मैलांवरच्या मन्सूर गावच्या भीमराय पाटिलांनी धारवाडात उतरलेल्या काही कलाकारांना शिवरात्रीनिमित्त भजनासाठी आपल्या गावात पाचारण केलं. मन्सूरच्या गावकऱ्यांनी तोपर्यंत तंबोरा हे वाद्य पाहिलंच नव्हतं. आयुष्यात प्रथमच तंबोऱ्याचा झंकार कानावर पडत असतानाच भीमरायांच्या पत्नी नीलव्वा यांनी एका पुत्ररत्नाला जन्म दिला.

घराण्याचं कुलदैवत असलेला श्रीशैल क्षेत्रीचा मल्लिकार्जुन - मल्लिकागौर शंकरच पूर्वपुण्याईमुळे घरी अवतरला, या श्रद्धेनं भीमरायांनी नवजात अर्भकाचं नाव मल्लिकार्जुन ठेवलं.

जन्मतः कानी पडलेला तानपुऱ्याचा निनाद ते बाळ विसरलं नाही. आई गात असलेली ओवी - अंगाई, देवळातून ऐकू येणारा घंटारव ऐकत मल्लिकार्जुन वाढू लागला. भाऊ बसवराज अप्पय्या स्वामींकडून कर्नाटकी संगीत शिकू लागला की रंगलेला गोट्यांचा खेळ सोडून चिमुकला मल्लू धावत घरी यायचा.

ज्ञानाचा प्रकाश तर दूरच, साधा सूर्यप्रकाश देखील नसलेली अंधारी शाळा न आवडल्यामुळे छोटासा मल्लू भावापाठोपाठ नाटककंपनीत दाखल झाला, तरी वडिलांनी त्याला परत आणलं होतं.

तेव्हा संगीत भास्करबुवा बखले धारवाड इथल्या ट्रेनिंग कॉलेजमध्ये संगीत शिकवत. पहिल्या महायुद्धाच्या वेळी वॉर फंड जमवण्यासाठी हिंदुस्थानी संगीतप्रेमी जज् के. क्लेमेंट यांनी तीन दिवसांचा संगीत महोत्सव केला. तेव्हा भास्करबुवा, संगीतसम्राट अल्लादियांखां, त्यांच्या शिष्या केसरबाई केरकर, प्रसिद्ध बीनकार बंदे अली खां, नत्थनखां, उस्ताद फैयाजखां, अब्दुल करीम खां आणि त्यांची छोटीशी मुलगी हिरा बडोदेकर - या सर्वांचं संगीत ऐकून सात आठ वर्षांचा मल्लू वेडावून गेला.

सुरांच्या हिंदोळ्यावर नित्य झुलत राहायच्या इच्छेनं तो आपला भाऊ काम करत असलेल्या वामनराव मास्तरांच्या नाटक कंपनीत दाखल झाला.

भक्त प्रल्हाद, बाळकृष्ण या संगीत भूमिका करत लोकप्रियतेच्या लाटेवर आरूढ झालेल्या आठ नऊ वर्षांच्या मल्लूला अथणीच्या स्वामी शिवयोगींनी आशीर्वाद दिला.

आणि नीळकंठबुवा आलूरमठ या बाळकृष्णबुवा इचलकरंजीकरांच्या मिरजेत राहाणाऱ्या शिष्यानं स्वतःला संतान नसल्यामुळे एक उत्तम शिष्य घडवावा, या महत्त्वाकांक्षेनं मल्लूला आपल्याकडं न्यायचं ठरवलं.

मिरजेला पाठवण्यापूर्वी भीमरायांनी मल्लूला हुबळी इथल्या सिद्धारूढ स्वामींच्या पायांवर घातलं तेव्हा स्वामींनी त्याला मोठ्या प्रेमानं उपदेश केला.

'... मडकेय माडुवरे मण्णे मोदलु...'

मडकी बनवण्यासाठी जशी प्रथम माती, दागिने घडवण्यासाठी जसं आधी

सुवर्ण हवं, त्याचप्रमाणे शिवपथावर, ज्ञानपथावर पोचण्यापूर्वी आधी गुरुपथ चोखाळावा लागतो.

'गुरुविन गुलाम नागुव तनका
दोरेयदण्ण मुगुतीऽ...'

अध्यात्ममार्गावरील गुरुची गुलामी केल्याखेरीज जशी मोक्षप्राप्ती होत नाही, त्याचप्रमाणे ज्ञानदाता गुरू प्रसन्न होईपर्यंत विद्येचा लाभ होत नसतो.'

'असे साधू, सत्पुरुष माझ्या रसयात्रेच्या टप्प्या टप्प्यावर माझा हात धरून चालवत राहिले,' असं पं. मन्सूरांनी 'नन्न रसयात्रे' या आपल्या त्रोटक आत्मचरित्रात लिहून ठेवलं आहे.

मग...

या संत सज्जनांच्या आशीर्वादांनी पं. मन्सूरांना सतत सोबत केली असेल का?

गायकीच्या दृष्टीनं दक्षिणेतील ग्वाल्हेर म्हणावं असं मिरज! इथं इतर पिकं कोणती येतात, कोण जाणे!

सुरांचं पीक मात्र इथं उदंड आलं.

स्वरस्वतीच्या वीणेतून स्फुरलेली, श्रीकृष्णाच्या मुरलीतून स्त्रवलेली, नटराजाच्या डमरूतून निनादलेली गानकला त्याच पंचाननाच्या अघोर या मध्यमुखातून प्रथम भैरव या रागाच्या रुपातून प्रकट झाली.

म्हणून नीळकंठबुवांनी मल्लूला प्रथम भैरव राग शिकवायला सुरुवात केली.

'बुवांच्या सान्निध्यात साधना करत असता मला षड्जाचा अर्थ तळहातावरील आवळ्याप्रमाणे दृष्टिगोचर होऊ लागला. षड्ज म्हणजे सहा स्वरांचा जन्मदाता. सगळे स्वर ही षड्जाचीच विविध रूपं, आणि सारे राग हे देखील षड्जाचेच नाना प्रवाह हे मला समजू लागलं.'

असे उद्गार तंबोऱ्याला संगीतकारांचा बोधिवृक्ष मानणाऱ्या पं. मन्सूरांनी 'नन्न रसयात्रे'मध्ये काढलेत.

छोट्याशा मल्लूनं मिरजेत ख्वाजा शमना मीरा साहेबाच्या दर्ग्यासमोरील झाडाखाली बसून गाणाऱ्या अब्दुल करीमखां साहेबांचं अंतःकरणाला हात घालणारं भावनाप्रधान गाणं ऐकलं. सांगलीचे राजवैद्य सांबारे यांच्या घरच्या गणेशोत्सवात संगीतसम्राट अल्लादियाखां यांचं गायन ऐकत असता मल्लूला संगीतसागराची अथांगता आणि त्याचा विस्तार यांची जाणीव झाली, तर कोल्हापूरच्या महालक्ष्मीच्या नवरात्रोत्सवात संगीतसम्राटांचे बंधू हैदरखां यांची स्वरलीला अनुभवून मल्लूला स्वतःतच काही परिवर्तन घडतंय असं वाटलं.

औदुंबर येथील कृष्णेच्या घाटावर ओलेत्यानं गानसमाधी लावून उभे असलेल्या भूगंधर्व रहिमतखां यांचा मल्हार ऐकताना मल्लू स्वरांच्या वृष्टीत चिंब भिजला, तर कोल्हापुरात गोविंदराव टेंबे यांचं भुरळ घालणारं पेटीवादन ऐकून त्याच्या अंगावर सुखाचे शहारे आले.

वामनबुवा चाफेकर हे नीळकंठबुवांचे गुरुबंधू. देवानं त्यांच्या झोळीत स्वरांचं एवढं ऐश्वर्य ओतलं होतं की, आता बुद्धीचं ओझं त्यांना पेलणार नाही, अशी भीती त्याला वाटली असावी. उकिरड्यावर बसून देखील गाणाऱ्या वामनबुवांचं संगीत ऐकताना मल्लूला गुरुपत्नीनं सांगितल्या कामाचा विसर पडत होता.

मल्लूला गाणं जास्तीत जास्त शिकवायचं आणि ऐकवायचं, असाच पण जणू नीळकंठबुवांनी केला होता. वझेबुवांचं घनगंभीर गाणं तर त्यांनी मल्लूला ऐकवलंच, पण बालगंधर्वाची नाटकंही दाखवली.

दिव्य शांतीचा प्रत्यय आणून देणारं बालगंधर्वांचं नाट्यसंगीत ऐकून मल्लूला नादब्रम्हाचा साक्षात्कार होणं म्हणजे काय, याची अंधुकशी कल्पना येऊ लागली.

गंधर्व कंपनी एवढीच बलवंत संगीत मंडळी ही लोकप्रिय नाटक कंपनी. तिचे गायनगुरू गणपतीबुवा भिलवडीकर व नीळकंठबुवा - हे दोघेही गुरुबंधू.

यामुळे मल्लूला मास्टर दीनानाथ मंगेशकर यांची 'रामराज्यवियोग, 'शाकुंतल' व 'मानापमान' ही नाट्य पाहायला मिळाली.

मा. दीनानाथ म्हणजे सळसळ चैतन्य व अवीट स्वरमाधुरी यांचा सुरे संगम. सामर्थ्यानं ओतप्रोत रसरसले असं दीनानाथांचं गायन ऐकून मल दबकल्यासारखाच झाला होता. त्यां दुरून पाहण्यातच धन्यता मानत होता.

पण पुढे पंचवीस सालच्या श्रावण 'रणदुंदुभी' या आपल्या नाटकाती पदांसाठी वझेबुवांकडून चाली घ्याव्या म्हणून मा. दीनानाथ वझेबुवांचं शिष्य पत्करणार होते. वझेबुवां नीळकंठबुवांना गंडाबंधन समारंभास मिरजेहून एक उत्तम तंबोरा घेऊन याय लिहिलं आणि मल्लूच्या हाती तंबो देऊन नीळकंठबुवा बेळगाव इथं ह झाले.

गगनाला गवसणी घालू पाहण अद्भुत स्वरविश्व निर्माण करणा दीनानाथांनी मल्लूचं ते ध्यान पा त्याला 'अर्धा नारद' असं नाव ठेवलं.

पण एका सकाळी मल्लूनं गायले अहीर भैरव ऐकून दीनानाथ चकि झाले. हात उंचावून ते म्हणाले -

'मी दशग्रंथी ब्राम्हणाचा मुलगा तु आशीर्वाद देतोय. खूप मोठा गा होशील तू!'

मा. दीनानाथांचं हे शुभचिंतन त्य कन्या लता आणि मल्लिकार्जुन मन्स या दोघांच्याही बाबतीत वास्तवरूप धा करतं झालं.

पण मा. दीनानाथांची ही शुभेच्छ मन्सूरांना कायम सोबत करत होती क

वयात येताना आवाज फुटल मल्लू धारवाडला परतला.

रात्री रियाजाला बसणाऱ्या मल रॉकेलच्या धुरानं त्रास होई म्हणून त आई कडू तेलाची पणती लावून ठेवा

उजाडेपर्यंत गाऊन मल्लू डोळे उघडायचा तेव्हा ती पणती केव्हाच शांत होऊन गेली असल्याचं त्याच्या ध्यानात यायचं.

पण दोन तीन वर्षांनंतर भरीव, गोल होत आलेला आपला समर्थ स्वर विलक्षण लवचिक झाला असल्याचं जाणवल्यावर मल्लूला विलक्षण आनंद झाला.

'वीर अभिमन्यू' या नाटकाचं मल्लूनं संगीत दिग्दर्शन केलं तेव्हा, स्वतःच्या प्रतिभेचा त्याला विस्मय वाटला.

गंधर्व कंपनीच्या धर्तीवर, 'वाणीविलास' ही नाटक कंपनी निघाली होती. मल्लूबरोबर तेव्हा गोहरजान कर्नाटकी ही नटी नायिकेच्या भूमिका करायची.

मीरेनं श्रीकृष्णाचा ध्यास घ्यावा, तशी गोहरजानची बालगंधर्वांवर असणारी भक्ती पाहून मल्लू चकित व्हायचा.

मल्लूनं दिलेल्या संगीतामुळे 'वाणीविलास' नाटक कंपनीनं कन्नड रंगभूमीवर इतिहास घडवला. पण त्या नाटकात देवाची आरती करायचा एक प्रवेश होता आणि एवढ्याशा निरांजनाची ज्योत लागून कंपनीचा तो वैभवी दरबार एकेदिवशी क्षणार्धात भस्मसात होऊन गेला.

'जेवढा उत्कर्ष मोठा, तेवढ्याच लौकर विनाश घडत असतो.'

आईनं मल्लूची समजूत काढताना म्हटलं.

या तत्त्वज्ञानानं पं. मन्सूरांची कायमची सोबत केली असेल का?

जलसे करून श्रोत्यांना मंत्रमुग्ध करणाऱ्या मन्सूरांना वयाच्या तेविसाव्या वर्षी 'संगीतरत्न,' 'गंधर्वरत्न' या पदव्या मिळाल्या. एच. एम. व्ही. नं त्यांच्या काढलेल्या रेकॉर्डस्‌नी लोकप्रियतेचं एक रेकॉर्ड निर्माण केलं. मुंबई इथं गणेशोत्सवात सतत दहा रात्री मोठ्या बिदागीसह त्यांचं गाणं झालं.

मा. दीनानाथ मंगेशकरांनी मन्सूरांना आपण दिलेला आशीर्वाद खरा ठरला ना, असं विचारलं. तरीही या यशाची धुंदी त्यांना कधी चढली नाही. त्याचं कारण आईचा हा उपदेश नित्य त्यांची पाठराखण करत असेल का?

संगीतसूर्य तानरसखां यांच्या घराण्यातील ज्या संगीतकाराविषयी त्यांच्या जिवंतपणीच आख्यायिका पसरल्या होत्या, त्या छब्बूखांची व मन्सूरांची सोलापुरात भेट झाली. साधारण अशा एका पेटीवर गाणं मन्सूरांना नको वाटतंय, हे पाहून छब्बूखां म्हणाले,

'साज बेसुरा हो तो क्या? हम गानेवालों को सूर की सुध हो, तो काफी है!'

छब्बूखां यांच्या या विधानानं मन्सूरांची कायम सोबत केली असेल का?

हाक्केरी येथील शिवबसव स्वामींच्या मठात मन्सूर संगीतसेवा करत असता स्वामींच्या कुणा शिष्यानं त्यांना सायंपूजेची वेळ झाली असल्याचं स्मरण केलं.

भानावर येत स्वामी म्हणाले -

'चाललेल्या या संगीताहून शिवपूजा काही वेगळी असते का?'

अधिकारवाणीतील या उद्गारानं मन्सूरांची कायम सोबत केली असेल का?

हो. बहुधा या नंतर ते जास्त अंतर्मुख झाले असावेत. कोणतेही काम मनापासून केलं की ते पूजेचं रूपच धारण करतं. इथं तर नादब्रम्हाची उपासना हेच मन्सूरांच्या आयुष्याचं ध्येय होतं.

शिवरात्र संपत असता मन्सूरांचा जन्म अमावास्येच्या दिवशी मूळ नक्षत्रावर झाला होता. हे मूल घराण्याच्या मुळावरच घाव घालील, या भीतीनं भीमरायांच्या हितचिंतकांनी त्यांना तान्ह्या मल्लिकार्जुनाला मुरुसावीर मठाच्या जगद्गुरुंना अर्पण करायला लावलं होतं.

पण आईचा आक्रोश न साहवून स्वामींनी या बाळाला शुभेच्छापूर्वक




तिच्याच ओटीत घातलं. आणि हे मूल मठाचं असं मानून त्याला वाढवायची अनुज्ञा दिली.

म्हणजे जन्मतःच मल्लिकार्जुन भक्तिमार्गाला लागला होता. लहानपणापासूनच त्याला सहजी संतसमागम घडत होता, साधुसंतांचे आशीर्वाद लाभत होते.

म्हणजे संसारात कमलपत्राप्रमाणे राहून, स्वरांची बिल्वपत्रं वाहत शिवपूजा करणं, हेच आपल्या आयुष्याचं उद्दिष्ट, हेच जीवनाचं प्रयोजन असं मन्सूरांना शिवबसव स्वामींचा उत्स्फूर्त उद्गार ऐकल्यापासून वाटू लागलं असेल का?

संगीतात जास्त प्राविण्य मिळवण्यासाठी मन्सूर तळमळत होते. त्यांना चांगला गुरू हवा होता.

पण वझेबुवांना मन्सूरांना शिकवण्यासाठी पुरेसा वेळ नव्हता.

'वाणीविलास' कंपनी अग्नीच्या भक्ष्यस्थानी पडली तेव्हा मल्लूला सावरण्यासाठी भीमराय म्हणाले होते -

'देव करतो ते भल्यासाठीच! याहून उज्ज्वल भवितव्य तुझी प्रतीक्षा करत असेल.'

ध्रुपदातील आलापी, धमारमधील बोलताना, ठुमरीतील बोल उपज आणि टप्प्यामधील ताना - या चारी अंगांचा कौशल्यानं समन्वय साधून जुन्या जाणत्या बुजुर्गांनी जी ख्यालगायकी निर्माण केली होती, तिला खूपच नवं आणि आकर्षक रूप देऊन संगीतसम्राट अल्लादियाखां यांनी एक वैभवशाली परंपरेला जन्म दिला होता.

'संत तुकाराम' या सिनेमाद्वारे प्रसिद्धीस आलेल्या विष्णुपंत पागनीस यांच्या स्नेहातून मन्सूरांना अल्लादियाखां यांचे चिरंजीव उस्ताद मंजीखां हे गुरू लाभले.

आणि तहानलेल्या मन्सूरांना हाती अमृतकुंभ आल्याचा भास झाला.

'देव एखाद्या बाबतीत निराशा करतो, तो त्याहून मोठा आनंद मिळवून देण्यासाठी!'

हे पित्यानं काढलेले उद्‌गार मन्सूरांना नित्य दिलासा देत राहिले असतील का?

प्रवाही आलापी, प्रदीर्घ दमसास, तिन्ही सप्तकांतून बिहरणाऱ्या सुरेल ताना; राग, ताल व स्वर यांचा सहजी साधला जाणार त्रिवेणी संगम -

मंजीखांच्या गाण्यांतली ही वैशिष्ट्यं मन्सूर आनंदानं वेचू लागले.

ख्याल, ठुमरी, भजन, गझल, मराठी नाट्यगीतं आणि भावगीतं-

मंजीखां काहीही गायले तरी त्यातून डोकावणारी जयपुरी घराण्याची ऐट पाहून मन्सूर भारावून जात. शुद्ध सोन्याच्या या खाणीतील सोनं मिळवताना आपल्या सामर्थ्याची पहार फारच छोटी वाटतेय, असं मन्सूरांना वाटत असतानाच अचानक मंजीखांचं ऐन तारुण्यात निधन झालं.

आणि मृत्यूच्या या गिधाडानं मंजीखांना उचलण्याऐवजी आपल्यावर का झेप घेतली नाही, असं मन्सूरांना होऊन गेलं.

नैराश्याच्या या भोवऱ्यातून आपण कधी बाहेर येऊ, असं मन्सूरांना वाटलंच नाही.

पण गंडाबंधनापूर्वी मंजीखांनी मन्सूरांना म्हटलं होतं - 'गुरुचं नाव काढणारा शिष्य तयार करायचा, म्हणून शिकवणार आहे मी तुला!'

मंजीखांची ही अपेक्षा मन्सूरांना आजन्म सोबत करत राहिली असेल का?

'जिथं इतर घराण्यांची व अनेक कलाकारांची गायकी संपते, तिथं आमच्या घराण्याची सुरू होते.'

मंजीखां अनेकदा म्हणत असत.

गुरुंच्या उद्‌गारांची प्रचीती आणून द्यायची जबाबदारी, ही परंपरा पुढे चालवण्याचं दायित्व आपल्यावर आहे, ही जाणीव मन्सूरांना नित्य जागृत ठेवत राहिली असेल का?

मंजीखांच्या निधनामुळे मल्लूच्या मनाला आलेलं औदासिन्य थोडं दूर व्हावं, म्हणून आई नीलव्वा मल्लूला आग्रहानं महाशिवरात्रीच्या निमित्तानं श्रीशैल क्षेत्रीच्या मल्लिकार्जुनाच्या दर्शनाला घेऊन गेली.

पण मल्लू पाताळगंगेत पोहायला गेला असता सारे पैसे व परतीची तिकिटं ठेवलेला कोटच चोरीला गेला.

अतिशय वैफल्य आलेल्या मन्सूरांना देवदर्शनही नकोसं वाटलं. पण मध्यरात्रीपर्यंत त्यांची समजूत घालून आई त्यांना आवर्जून मंदिराकडे घेऊन गेली.

मंदिराची द्वारं बंद होती.

'मनापासून प्रार्थना केली की देव ती ऐकतो.' आईनं सांगितलं आणि मन्सूर गाऊ लागले -

'उळूळवरू शिवालय माडुवरो,
ना ने ऽ नु माडली बडवनय्या...'

'देवा, इतर भक्त तुझ्यासाठी मंदिरं बांधतात, नगरं उभारू शकतात. पण मी जन्मदरिद्री तुझ्यासाठी काय करू शकणार?'

पायाचेच खांब आणि मस्तकाचा कळस चढवलेलं हे माझ्या देहाचं मंदिर तुला आवडेल ना?

'ये देवा, या हृदयाच्या गाभा[ऱ्यात] नित्याचा वास करये!'

आणि मंदिराची द्वारं अपरात्री उ[घडून] पुजाऱ्यांनी या मल्लिकार्जुनाला मल्लिकार्जुनाचं दर्शन घडवलं.

मल्लूच्या आईनं देवाची प्रार्थना के[ली]

'संसाराविषयी मला आता [कोणतीही] आसक्ती राहिलेली नाही. [हे] मल्लिकार्जुना, तू खरोखरच इथं वास करत असलास, तर मला इथंच तु[झ्या] चरणी आश्रय दे.'

'आम्ही तुला जाऊ दिलं तर देवाकडे जाणार ना?' मल्लूनं आ[र्त] चेष्टा केली.

पण जवळच्याच गंगेपली खेड्यातील 'अडवीस्वामी' देवळासमोरील अंगणात पहाटे [...] सतरंजीवर गुलाबी झोपेत अ[...] जवळच्या भिंतीला टेकून ठेव[लेलं] बैलगाडीचं चाक घरंगळत आलं अ[णि] कुणाला काही कळण्यापूर्वीच मन्सूर[ांच्या] आईचा प्राण घेऊनच पुढे गडगडलं.

मातृवियोगाचं दुःख मन्सूरांना अस[ह्य] होतंच!

पण... तरीही...

'मनापासून प्रार्थना केली की देवापर्यंत पोचते.' -

आईचा हा प्रार्थनेवरला विश्[वास] मन्सूरांना आयुष्यभर संगत करत रा[हिला] असेल का?

मंजीखां साहेबांच्या मृत्यूनंतर थ[कून] खचून गेलेल्या उस्[ताद] अल्लादियाखांसाहेबांमध्ये मन्सूरांसार[ख्या] विजिगीषु वृत्तीच्या गवयाला शिकवण्य[ाची] ताकत राहिली नव्हती. पण त्यांचे क[निष्ठ] चिरंजीव उ. भूर्जीखां यांनी मन्सूर[ांना] तालीम द्यायला सुरुवात केली. दुस[ऱ्या] महायुद्धाच्यावेळी मुंबईवर बॉंबह[ल्ला] होईल, या भीतीनं भूर्जीखां व म[न्सूर] मुंबईला जाऊन बडेखांसाहेब कोल्हापूरला घेऊन आले.

यामुळे मन्सूरांना बडेखां साहेबांच्या मार्गदर्शनाचाही लाभ होऊ लागला. भूर्जीखांचे चिरंजीव अझीझुद्दीनखां ऊर्फ बाबा, हे आजोबांचे अगदी लाडके नातू. आजोबा आपल्या नातवाला काही चिजा देत आणि बाबा अगदी प्रेमानं हे अमोल अलंकार मन्सूरांना देऊन टाकत.

एकदा बडेखांसाहेब नमाज पढून आल्यावर मन्सूर सहजच म्हणाले - 'एवढ्या नियमानं, एवढ्या श्रद्धेनं मी नेहमी पूजा करतोच, असं नाही.'

तेव्हा बडेखांसाहेब म्हणाले -

'फूल चढाने से ज्यादा सुरों की पूजा पा कर भगवान और भी खुश होता होगा!'

पुष्पपत्रांनी केलेल्या पूजेपेक्षा स्वरांनी केलेली आराधना जास्त श्रेष्ठ, हे अल्लादियाखां यांचं विधान खूप पूर्वी शिवबसवस्वामींनी काढलेल्या उद्गाराचंच समर्थन करत होतं.

बडेखां साहेबांच्या या वाक्यानं मन्सूरांच्या मनात नित्य वास केला असेल का?

हो. तसंच असेल.

संगीतावरील या श्रद्धेनंच मन्सूरांना आयुष्याची लढाई धीटपणानं लढायचं बळ दिलं असेल. नाहीतर कलाकारांना मानधन देताना आकाशवाणी भेदभाव करते, हे दिसून आल्यावर चणेमुरमुऱ्यांवर दिवस काढत असतानाही मन्सूरांनी आकाशवाणीवर बहिष्कार टाकला नसता.

अथणीचे शिवयोगीस्वामी, मुरगोडचे महांतस्वामी आणि धारवाडइथल्या मुरुघामठाचे मृत्युंजयस्वामी - यांच्या सहवासात मन्सूरांना अध्यात्माची गोडी लागली आणि मग 'सुखदुःखे समे कृत्वा' अशी त्यांची वृत्ती होऊन गेली.

स्वर आणि परमेश्वर यांचं अद्वैत जाणवल्यावर पंडितजी मग आयुष्यभर कोणत्याही प्रसंगी विचलित झाले नाहीत. त्यांच्या बहादुरी तोडीतला 'महादेव' जणू त्यांच्या देहात वास्तव्य करू लागला आणि त्यांच्या बसंत केदार रागातला 'अतर सुगंध,' मालवीतला 'अंग सुगंध' त्यांचं सारं जीवन व्यापून राहिला.

एका पत्र्याच्या खोलीत आजारी पत्नी आणि आठ मुलांना घेऊन रात्री निद्रेची आराधना करू पाहणाऱ्या पंडितजींच्या समोर नागदेवाचं धूड येऊन दारात पसरलं.

पशुपतीनाथानं आपल्या संरक्षक शक्तीचा अशा रीतीनं प्रत्यय घडवला, असं मानून पंडितजींनी नागाला हात जोडले आणि तो समाधान पावून निघून गेला.

पद्मश्री, पद्मभूषण या पदव्या. 'इंडिया टूडे'नं केलेलं पंडितजींवरचं फोटो फीचर. मध्यप्रदेश सरकारनं दिलेला पहिला कालिदास सन्मान. शांतिनिकेतनानं दिलेली देशिकोत्तम ही उपाधी. संगीत नाटक अकादमीनं दिलेले पुरस्कार.

कविवर्य द. रा. बेंद्रे यांनी पंडितजींवर रचलेली कविता आणि पंडितजींच्या शिष्यांनी रचलेली मन्सूरी केदार, मन्सूर मल्हार हे राग!

या असंख्य तऱ्हांनी होत असलेला गौरव आणि एकुलत्या एक मुलानं प्रेमविवाह केला, तेव्हा झालेला मनस्ताप -

दोन्ही पंडितजींनी एकाच मापानं मोजली.

पत्नी गंगव्वा यांचं निधन झालं तेव्हा तर 'दोघांपैकी एकानं प्रथम जायचंच असतं!' असा उद्गार काढून पंडितजी शांतपणे आपल्या खोलीत गेले. दारे लावून घेऊन सुरांच्या सहवासात गेल्यावरच निराधारपणाची त्यांची जाणीव थोडी बोथटली असावी.

तंबोऱ्याचा झंकार ऐकून स्वरब्रह्मात विलीन व्हायची ही त्यांची सवय जुनीच होती. प्रसिद्ध तबलजी बसवण्णी बेंडिगेरी यांच्या बेळगाव इथल्या घरी रात्रीची मैफल संपली आणि सकाळी पंडितजी नापिताकडून दाढी करून घ्यायला बसले.

कोपऱ्यातल्या तंबोऱ्याला कुणाचा तरी




हात लागला आणि तंबोरा झंकारला. मन्सूरांना गालांवरील साबणाच्या फेसाची आठवणच राहिली नाही. 'तंबोरा चालू दे' अशी हातानंच खूण करून पंडितजी तोडी गाऊ लागले ती दुपारपर्यंत! 'मला दुसऱ्या कामाला जायचंय हो!' अशी नापितानं गयावया केल्यावर त्यांना सुरांच्या राज्यातून परत यावंच लागलं.

उ. भूर्जीखां यांच्या थोरल्या चिरंजीवाचं अपघाती निधन झालं. गुरुंना भेटून परतत असता पंडितजी अत्यंत अस्वस्थ मनःस्थितीत होते. बसमधील फ्रंट सीटवर बसून ते सारखे गुणगुणत होते. मधूनच त्यांनी मोठ्यानं तान घेतली आणि ड्रायव्हरनं बस थांबवली. गाणारी व्यक्ती पं. मन्सूर आहेत, हे समजल्यावर त्यानं पंडितजींना 'कृपया मागे जाऊन बसावं' - अशी विनंती केली.

दोन वर्षांपूर्वी किडनीच्या विकारानं पंडितजी आजारी असता बेशुद्धावस्थेत देखील सतत गात असल्यासारख्या त्यांच्या हाताच्या हालचाली सुरु असत. आणि प्रकृती सुधारली असं डॉक्टरनी सांगितलं तरी नित्याप्रमाणे गाता आलं, हे पाहिल्यावरच पंडितजी उद्गारले -

'आता मी खरा बरा झालो!'

स्वप्रेम आणि देवभक्ती या पंडितजींच्या दोन महत्त्वाच्या प्रवृत्ती !

'देवा, माझ्या देहाचा दंड, मस्तकाचा भोपळा, शिरांच्या तारा आणि बोटांच्या तरफा वापरून तू वीणा बनव आणि उराशी धरून, ही देहवीणा छेडत तू (मूळचे) बत्तीस राग गा.'

या अर्थाचं महात्मा बसवेश्वरांचं एक वचन आहे, ते पंडितजींना फार आवडे.

कर्नाटकातील संत अक्कमहादेवी ही दक्षिणेतली मीराबाई मानली जाते.

चन्नमल्लिकार्जुन देवाला वरल्यानंतर त्याचा वियोग न साहवून अक्कमहादेवी त्याला शोधत जाते. निसर्गातील सजीव निर्जीव वस्तूंना त्याचा ठावठिकाणा विचारत जाते. तेव्हा तिच्या तोंडून 'अळिसंकुळवे, मामरवे, कोगिले, बेळदिंगळे...' हे स्फुरलेलं पद कर्नाटकात फार प्रसिद्ध आहे.

'भुंग्यानो, तुम्ही माझ्या चन्नमल्लिकार्जुनाला पाहिलंत का? आम्रवृक्षा, माझ्या जीवीचा जीव कुठे आहे, ते तुला माहीत आहे का रे? कोकिळे, तू तरी सांग ग. चांदण्या, तू तर विश्वाला व्यापून असतोस. माझा सखा कुठे आहे, ते तुला तर माहीत असेलच...'

त्या विरहिणीच्या व्यथेशी पंडितजी अत्यंत समरस होऊन हे पद गात, तेव्हा स्वतःच्याच मनीचं गुज ते व्यक्त करताहेतसं वाटे. स्वप्नामध्ये चन्नमल्लिकार्जुनाचं दर्शन घडलं. आणि त्या आधी नारळ, सुपारी, तांदूळ इत्यादी शुभसूचक वस्तु दिसल्या, तेव्हा अक्कमहादेवीला झालेला आनंद 'अक्क केळव्वा, नानोंदु कनस कंडे...' हे पद गात पंडितजी व्यक्त करत, तेव्हा तर तो त्यांचा स्वतःचा सुखद अनुभवच स्वरूपानं प्रकट होतोय असं वाटायचं.

पंडितजींच्यावर पुस्तक लिहायचं ठरल्यावर काहीही विचारायला मला त्यांनी मुभा दिली होती. अनेक गोष्टींचे तपशील विचारल्यावर माझं कुतूहल गप्प बसेना.

'तुमच्या आयुष्यात कधी... काही... मोहाचे क्षण आले की नाही?' मी संकोचत पृच्छा केली.

'मीही माणूसच होतो.' पंडितजी म्हणाले. 'तरुण वय. मुंबईत मी एकटा. भरीला खूपशी लोकप्रियता. भोवती स्तुतिपाठकांचा मेळावा. मी वाहवलो नसलो तरच नवल!'

पंडितजी गंभीर झाले.

'पण... माझी पत्नी... किती विश्वासानं तिनं मला सगळं स्वातंत्र्य दिलंय, याचा मला कधी विसर पडला नाही आणि शरणसाहित्यानं देखील माझा विवेक जागृत ठेवला.'

शरण म्हणजे शिवभक्त, जसे आपल्याकडे संत स्वतःला रामदास, विष्णुदास म्हणवतात.

स्वतःशीच गुणगुणत पंडितजी सांगत होते-

''तुला 'छल बेकु शरणनिगे...' हे कन्नड वचन माहित आहे?''

मी समजले. शिवभक्ताला परधन वर्ज्य असावं. परस्त्री मातेसमान मानण्याचा त्याच्यात निग्रह असावा, अशा अर्थाचं ते वचन मला पाठच होतं आणि 'परधन, परदारा आम्हां मृत्तिकेसमान' असं म्हणणाऱ्या तुकारामांची मला आठवण झाली.

पंडितजींचं माझ्याकडे जणू लक्षच नव्हतं.

'मृत्युंजय स्वामींनी मला एक वचन दिलं - तुमच्या गांधीजींच्या तीन माकडांचाच तो जुना नमुना म्हणायला हवा.' आणि ते गुणगुणू लागले -

'अत्त इत्त होगदंते हेळवन माडय्या तंदे...'

'देवा, माझं मन तर चंचलच आहे. तुझ्या चरणांपासून मी दूर जाऊ नये, म्हणून मला तू पांगळाच कर कसा! तुझ्या नावाखेरीज वेगळं काही ऐकावं लागण्यापेक्षा तू मला आपला बहिराच कर. तुझ्या नावाखेरीज अन्य उ
जिभेकडून घडू नये, म्हणून मुका हो
बरं वाटेल मला...' वगैरे... वगै
अर्थाचं ते पद...

पंडितजींनी एवढं आत्मसात क
टाकलं होतं?

गेल्या वर्षी जानेवारीत र
पद्मविभूषण पदवी मिळाली ही ब
धारवाड आकाशवाणीनं जाहीर कर
अनवधानानं ती 'मरणोत्तर' प्रदान ह
असल्याचं सांगून टाकलं.

सारं धारवाड चमकलं.
पंडितजींना याचं हसूच आलं. 'उ
मरण पाहिले म्यां डोळा' - ही स्थितप्र
वृत्तीच त्यांना अविचलित राखू शकल

एप्रिलमध्ये जयपूर घराण्याच
अध्वर्यू पंधरवडाभर कोमात जा
रसिकांच्या पुण्याईनं पुन्हा त्यांची त
सुधारली.

ऑगस्टच्या सुरुवातीला पं
आकाशवाणीच्या केंद्रात र
रेकॉर्डिंगही करून आले.

पण त्याच वेळी उजव्या फुप्फु
आढळलेल्या छोट्याशा
आठवडाभरात चेंडूएवढ्या गुल्मात र
झालं.

पण कर्करोगाची एवढ्या झप
झालेली ही वाढ पाहता पंडि
उपचारांसाठी मुंबईला नेणं अ
होतं.

तरीही सूर ऐकण्याची
ऐकवण्याची त्यांची आस मात्र कमी
नव्हती.

राजशेखरला गायला सां
स्वतःदेखील थोडावेळ हेमनट गाय
'तुम बिन मैं को कल ना परत,
बीत गये बरसा....'

परमेश्वराच्या प्राप्तीची f
मनाला लागलेली ही वर्षा
तळमळ या चीजेतून राजशेखरना
जाणवली.

दरवर्षी श्रावणातल्या

सोमवारी मुरुघामठात संगीतसेवा करायची, हा पंडितजींचा प्रघात होता.

पण या खेपेस शेवटच्या सोमवारचा भरवसा नाही, म्हणून पंडितजी तिसऱ्याच सोमवारी गाडीतून मुरुघामठाला गेले.

खरं म्हणजे जिथं दंडवत घालत जावे, अशा ठिकाणी लोकांच्या हाताच्या पालखीतून जायची वेळ आल्यामुळे पंडितजींना फार वाईट वाटलं.

एका बाजूच्या तंबोऱ्यावर साथीसाठी राजशेखर होते आणि दुसरा तंबोरा अक्कमहादेवींनं धरला होता. पेटीवर शिष्य पंचाक्षरीस्वामी मत्तीगट्टी होते.

पंडितजींना 'पाहि गिरिराज, दयाविराज' ही भीमपलासातली चीज घेउन मग झिंझोटीतली 'महादेव विश्वंभर' ही घ्यायची असावी.

पण त्यांचा स्वर तार षड्जाशी पोचेच ना.

मृत्युंजय स्वामींनी समजूत घातली -

'मल्लेशप्पा, पुरे आता संगीत सेवा! देवाला ती पोचली बरं का!'

पंडितजी मनाशी म्हणत होते -

'अशी कशी एवढ्यात संगीतसेवा त्याच्या चरणी रुजू होईल ?'

'वचनदल्लि नामामृत तुंबि...' हे वचन म्हणत मला डोळ्यांत त्याची मूर्ती साठवून घ्यायची आहे. मनानं त्याचं स्मरण करत, कानानं त्याची कीर्ती ऐकत त्याच्या चरणाशी नम्र व्हायचंय.

'पंपानगरी निवास जय' असा त्या विरुपाक्षाचा भैरवीत जयजयकार करत त्याच्याशी एकरूप व्हायचंय.

पण या रचना आज माझ्या जिभेवर का येत नाही आहेत ? मला त्यांचा विसर पडलाय, हे माझ्या लाडक्या अक्कम्माच्या कसं लक्षात येत नाहीय ? माझ्या काळजाचा तुकडा राजशेखर का त्यांची आठवण देत नाहीय मला ?

या पंचाक्षरीला मी किती विद्या दिली. त्या शिष्यानं तरी माझी अपेक्षा ओळखू नये का ?

कृष्णावतार संपला आणि अर्जुनाचा सगळा पराक्रम लयास गेला. त्याच्या डोळ्यांदेखत यादव स्त्रियांना चोरांनी पळवून नेलं.

तसंच माझ्या संगीतविद्येचं आज अपहरण होतंय आणि कोणीही तिचं संरक्षण करायला पुढे येत नाहीय.

त्या अर्जुनाकडून अग्निदेवानं आपण दिलेलं गांडीव धनुष्य परत घेतलं.

आज या मल्लिकार्जुनाचा स्वर हे सामर्थ्य देव हिरावून घेतोय.

अरे, कुणीतरी माझ्या मदतीला या रे !

नाही. सगळेच सुखातले सोबती.

आज मी अगदी एकटा आहे.

कितीतरी धन मिळवलं. आज त्याचा काही उपयोग नाही.

स्मरणशक्ती फुरंगटली, म्हणजे मनानं असहकार पुकारला.

शब्दोच्चार करण्यास जिव्हा असमर्थ ठरतेय. म्हणजे तन आपली मर्यादा सुचवून गेलं.

पण ज्या ईश्वराला स्वर मानून वा स्वरांना ईश्वर मानून मी जीवनभर त्या नादब्रह्माची आराधना केली, ते मात्र मला अंतर देणार नाही.

सगळे स्नेहसंबंध... सारी नातीं... सगळं सगळं खोटं !

अखेर एकमेव सोयरा तो परमेश्वर !

स्वरब्रह्म हा माझा खरा सखा !

आणि पंडितजींच्या मनातली ही श्रद्धा अत्यंत प्रबळ होत त्यांच्या मुखातून स्वररुपानं प्रस्फुटित होऊ लागली. आईमागून मूल दुडदुडत यावं, तसे मग शब्द देखील त्या स्वरधारेसह स्त्रवू लागले. वचनरूप लेऊ लागले.

''चंद्रोदयक्के अंबुधि हेच्चुवदय्या,
चंद्र कुंदे कुंदुवदय्या...''

'देवा, समुद्र आणि चंद्राची प्रीती काय वर्णावी ?'

चंद्रोदय झाला की सागराला भरती येते.

चंद्रतेज मंदावलं की सागरही झुरून मागे सरतो.

पण हे विलक्षण प्रेम परस्परांच्या संकटकाळी मात्र दिसून येत नाही.

अगस्ती ऋषी सागराचं आचमन घ्यायला निघाले, तर चंद्र आडवा आला नाही किंवा राहू चंद्रबिंब गिळंकृत करायला निघाला, तर सागरानं आक्रोश केला नाही.

कोणी कुणाचं नाही देवा, कोणी कुणाचं नाही.

या साऱ्या विश्वाचा एकमेव सखा फक्त तूच !

तूच माझा एकमेव आधार !

जगद नंटा नी ऽ ने अय्या कूडूलसंगमदेवा !'

आणि मन्सूरांना भावनावेगानं पुढे गाताच आलं नाही.

तेच पंडितजींचं अखेरचं गायन !

पण सुरांनी मात्र त्यांची साथ शेवटपर्यंत सोडली नाही.

पंडितजींच्या अंतकाळी त्यांच्या कानांवर तंबोऱ्याचा झंकार अखंडपणे येत राहावा, म्हणून राजशेखर सतत तानपुरा छेडत राहिले.

तंबोऱ्याचा नाद ऐकत जगात आलेला हा जीव त्याच स्वरांच्या संगतीत नादब्रह्माच्या चरणी विलीन झाला.

आणि 'राजद्वारे स्मशानेच यस्तिष्ठति स बांधवः' - ही उक्ती स्वरांनी सार्थ करून दाखवली.

□ □ □

मुलांची देवबाप्पास पत्रे -

प्रिय देवबाप्पा,

तुला जर इतकं सगळं करता येतं, तर सगळं पाणी मावेल एवढी मोठी नदी तू का केली नाहीस ? बघ, आमच्या घरात पुराचं पाणी शिरलं. आणि आता आम्हाला दुसरीकडं जाणं भाग आहे.

-व्हिक्टर